मागासवर्गीय व आर्थिकदृष्ट्या मागासवर्गीय मुलींचे शासकीय वसतीगृह, मालेगाव, जि. नाशिक या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१५/प्र.क्र.१५५/बांधकामे

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ४ डिसेंबर,२०१५

वाचा :-

१) शासन निर्णय, सा.न्या.व सां.का.व क्रि.वि.क्र.बीसीएच-२००५/प्र.क्र.५५४/मावक-४, दिनांक २८.७.२००७

२) आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र.सकआ/शिक्षण/शावगृ/सुप्रमा/मुलींचे/मालेगाव/का-५अ/२०१४-१५/५३५, दिनांक १२.३.२०१५

प्रस्तावना :-

१. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दि.२८/७/२००७ च्या शासन निर्णयान्वये मागासवर्गीय मुलांमुलींसाठी नवीन १०० शासकीय वसतीगृहे आणि विभागीय स्तरावर मागासवर्गीय मुलांमुलींसाठी १००० विद्यार्थी क्षमतेची नवीन शासकीय वसतीगृहे सुरु करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यामध्ये मालेगाव येथील मुलींच्या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाचा समावेश आहे. सदरहु वसतीगृहाच्या इमारत बांधकामा करीता वेळीच जागा उपलब्ध न झाल्याने सदरील इमारत बांधकाम हाती घेणे शक्य झाले नाही. सदर प्रशासकीय मान्यतेस पाच वर्षाचा कालावधी झाल्याने त्यामधील कामाचे आदेश व्यपगत झालेले आहेत. आता, या कामी जिल्हाधिकारी, नाशिक यांनी माजे निळगव्हाण ता.मालेगाव येथील गट नं.२० क्षेत्र ५ हे.४९ आर पैकी ८० आर इतकी जागा शासकीय वसतीगृहाच्या इमारत बांधकामासाठी मंजूर केली आहे. त्यानुसार अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ नाशिक यांच्या तांत्रिक मान्यतेने कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग मालेगाव यांनी या कामाचे रु.४७०.०० लक्ष किंमतीचे

ढोबळ अंदाजपत्रक सादर केले आहे. आयुक्त, समाजकल्याण यांनी त्यांच्या संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये मागासवर्गीय व आर्थिकदृष्टया मागासवर्गीय मुलींचे शासकीय वसतीगृह, मालेगांव, जि.नाशिक या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या सादर केलेल्या रु.४,६४,०३,४२६/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास नव्याने प्रशासकीय मान्यता देण्याची बाबत शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

२. मालेगाव, जि.नाशिक मागासवर्गीय व आर्थिकदृष्टया मागासवर्गीय मुलींच्या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या रुपये रु. ४,६४,०३,४२६/- (अक्षरी रुपये चार कोटी चौसष्ट लक्ष तीन हजार चारशे सव्वीस फक्त) इतक्या रक्कमेच्या ढोबळ अंदाजपत्रकास शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.:-

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा व विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मान्यता घेऊनच काम सुरु करावे.
२) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
३) ढोबळ स्वरुपात करण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक तयार करुन त्यास सक्षम प्राधिकाऱ्याची मंजूरी घेतल्यानंतरच काम हाती घ्यावे.
४) कामाची व्याप्ती पाहता अंदाजपत्रकावर संबंधित मुख्य अभियंता यांची मंजूरी घेण्यात यावी व मुख्य अभियंता यांचे सांक्षांकन आवश्यक आहे.
५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्रमांक इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१ दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
६) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांनी मंजूर केलेल्या टाईप प्लॉननुसारच सदर बांधकाम करण्यात येत असल्याचे मुख्य अभियंता यांच्याकडून प्रमाणित करण्यात यावे.
७) अंदाजपत्रकात दर्शविण्यात आलेली सोलर सिस्टीमची तरतूद त्या क्षेत्रातील तज्ञ सल्लांगारांकडून सल्ला प्राप्त करुन घेऊन मगच हाती घेण्यात यावीत.

३. सदर मागासवर्गीय मुलींच्या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त करुन, विहित नियमानुसार अटी व शर्ती निश्चित करुन ई-निविदा प्रसिध्द करण्याची कार्यवाही कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग मालेगाव यांनी तात्काळ करावी. ई-निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर, ई-निविदा प्रक्रियेची सर्व कागदपत्रे सामाजिक न्याय विभागाकडे (उपभोक्ता विभाग) दायित्व मंजूरीसाठी पाठविण्यात यावे. सामाजिक न्याय विभागाची अंतिम मान्यता झाल्यानंतरच बांधकामाबाबतची पुढील कार्यवाही करण्यात यावी.

४. मालेगाव, जि.नाशिक मागासवर्गीय व आर्थिकदृष्टया मागासवर्गीय मुलींच्या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या ढोबळ अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे:-

| GENERAL ABSTRACT FOR BACKWARD CLASS LADIES HOSTEL BLDG. AT MALEGAON, DIST.NASHIK | | |
|---|---|---|
| **Sr. No** | **DESCRIPTION OF ITEMS** | **A.A. AMOUNT (Rs.in Lacs)** |
| 1 | 2 | 3 |
| 1 | Cost of Hostel Building | 2,31,64,402.00 |
| 2 | Add for Internal Electrical Installation 13% | 31,41,373.00 |
| 3 | Add for External Electrical Installation (Lump sum) | 10,00,000.00 |
| 4 | Add for External Water Supply & Sanitation 5% | 12,08,220.00 |
| 5 | Cost for Compound Wall, Entrance Gate & Security Cabin | 46,32,006.00 |
| 6 | Construction of Internal Roads & CD Works | 10,64,000.00 |
| 7 | Add for Solar System (Lump sum) | 10,00,000.00 |
| 8 | Add for Rain Water Harvesting (Lump sum) | 10,00,000.00 |
| 9 | Construction of Flag Post (Lump sum) | 1,00,000.00 |
| 10 | Add for Fire Fighting Arrangement 7.5% | 16,89,326.00 |
| 11 | Add for Furniture (@Rs.5000/Sq.mt) | 51,19,350.00 |
| 12 | Add for Land Development & Gardening (Lump sum) | 5,00,000.00 |
| 13 | Add for Parking (Lump sum) | 5,00,000.00 |
| 14 | Add for DhobiGhat (Lump sum) | 5,00,000.00 |
| | **Total** | **4,46,18,677.00** |
| 15 | Add for Contingencies 4% | 17,84,749.00 |
| | **Grand Total** | **4,64,03,426.00** |

५. यावर होणारा खर्च मागणी क्र. एन-४, मुख्य लेखाशिर्ष ४२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती आणि इतर मागासवर्ग यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च, २७७-शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०३) मागासवर्गीय मुलांमुलींसाठी शासकीय वसतीगृह बांधणे (४२२५ ०४८१), ५३-मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०७१५००५११५२२ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakant Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9474e7143b2bc3fd96e8d7bf07d1ce51de8461d4c34ae1e3f643c11b54523936, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2015.12.05 17:12:27 +05'30'

**( चंद्रकांत ह. वडे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग(इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक
५) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
७) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
८) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नाशिक.
९) सहायक आयुक्त, समाजकल्याण, नाशिक.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
११) निवडनस्ती.